**शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा येथे स्थानिक सल्लागार समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः स्थासस-५८१४/प्र.क्र.९१/१४/मशि-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ०४ ऑगस्ट, २०१४.

**वाचा :- संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.ममअ-२०१४/ स्था.स.स./शाअमबु/ प्रशा-१/४२९८, दिनांक २२ मे, २०१४.**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ च्या कलम ८५ (२) अनुसार शासकीय महाविद्यालय/संस्था यांचेसाठी स्थानिक सल्लागार समितीची रचना करण्याची तरतूद खालीलप्रमाणे आहे:-

(१) संबंधित प्रादेशिक विभागाचे सहसंचालक, उच्च शिक्षण,

(२) उच्च शिक्षण, संचालक यांनी नामनिर्देशित केलेले विविध क्षेत्रातील ३ अशासकीय सदस्य,

(३) महाविद्यालय/संस्थेच्या शिक्षकांनी त्यांच्यामधून निवडलेले ३ शिक्षक सदस्य,

(४) महाविद्यालय/संस्थेच्या शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी निवडलेला एक शिक्षकेतर सदस्य,

(५) संबंधित महाविद्यालय/संस्थेचे संचालक, सदस्य सचिव.

उपरोक्त तरतुदीनुसार शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा येथे स्थानिक सल्लागार समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ च्या कलम ८५ (२) मधील तरतुदीनुसार शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा येथे स्थानिक सल्लागार समिती स्थापन करण्यास शासन मंजुरी देत आहे.

| अ.क्र. | नाव/पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | सह संचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग, अमरावती | अध्यक्ष |
| २ | डॉ. पुरुषोत्तम शिवाजी वायाळ | अशासकीय सदस्य |
| ३ | श्री. प्रसाद जाधव, रा. मलकापूर, जि.बुलढाणा | अशासकीय सदस्य |
| ४ | श्री. सुभाष पाटील, रा. बुलढाणा | अशासकीय सदस्य |
| ५ | डॉ. नूतन भानुदास चव्हाण, सहयोगी प्राध्यापक | शिक्षक प्रतिनिधी |
| ६ | डॉ. भीमराव सिताराम ठोंबरे, सहयोगी प्राध्यापक | शिक्षक प्रतिनिधी |
| ७ | डॉ. हर्षानंद पंजाबराव खोब्रागडे, सहयोगी प्राध्यापक | शिक्षक प्रतिनिधी |
| ८ | श्रीमती नीला पाठक, मुख्य लिपिक | शिक्षक प्रतिनिधी |
| ९ | प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा | सदस्य सचिव |

**समितीचा कार्यकाल** :- महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८५ (४) मधील तरतुदीनुसार नवनिर्मित समितीचा कार्यकाल या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ५ वर्ष इतका राहील. तथापि, दरम्यानच्या काळात समितीचा कार्यकाल समाप्त होण्यापूर्वीच अशासकीय अथवा निवडून आलेल्या (शिक्षक व शिक्षकेतर प्रतिनिधी) सदस्यांच्या जागा रिक्त झाल्यास उर्वरित कालावधीसाठी त्यांच्या जागी त्या त्या प्रवर्गातील सदस्यांची नियुक्ती करण्यात येईल व सदर नवनियुक्त सदस्यांचा कार्यकाल समितीच्या कार्यकालाबरोबरच समाप्त होईल.

**बैठका**:- नियुक्त करण्यात येणारी स्थानिक सल्लागार समिती वर्षातून किमान किमान दोनदा बैठका घेईल.

**समितीचे अधिकार व कर्तव्ये** :- महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८५ (५) अन्वये स्थानिक सल्लागार समितीचे अधिकार व कर्तव्ये विहित करण्यात आली आहेत. त्यानुसार नियुक्त करण्यात येत असलेल्या स्थानिक सल्लागार समितीचे अधिकार व कर्तव्ये पुढीलप्रमाणे आहेत:-

(क) अंदाजपत्रक व वित्तीय विवरणपत्रे तयार करणे,

(ख) अध्यापकीय व इतर पदे निर्माण करण्यासाठी व्यवस्थापनाला शिफारस करणे,

(ग) शैक्षणिक कार्यक्रम ठरविणे व अंतर्गत मुल्यमापन करणे आणि संस्थेतील अभ्यासाच्या प्रगतीविषयी चर्चा करणे,

(घ) महाविद्यालयामधील अध्यापनाचा दर्जा सुधारण्यासाठी व्यवस्थापनाकडे शिफारस करणे,

(ङ) महाविद्यालयाच्या अर्थसंकल्पामध्ये तरतूद न केलेल्या नवीन खर्चाचे प्रस्ताव तयार करणे,

(च) निरनिराळया वर्गाची प्रवेशक्षमता, वेळापत्रके तयार करणे, अध्यापनाच्या उपलब्ध कार्यभाराचे वाटप करणे यासारख्या बाबी, तसेच महाविद्यालयाचे अंतर्गत व्यवस्थापन व विद्यार्थ्यांच्या संस्थेतील शिस्तपालन व यासारख्या अनुषंगिक बाबीवर प्राचार्यांना सल्ला देणे,

(छ) निरीक्षण अहवाल प्राप्त झाल्यास, त्यावर विचारविमर्श करुन शिफारशी करणे,

(ज) स्थानिक चौकशी समितीचा अहवाल प्राप्त झाल्यास त्यावर विचारविमर्श करुन शिफारशी करणे,

(झ) ३० जून रोजी संपणाऱ्या शैक्षणिक वर्षात समितीने केलेल्या कामाचा वार्षिक अहवाल तयार करणे आणि तो विद्यापीठाच्या व्यवस्थापन परिषदेस व संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करणे,

(ञ) व्यवस्थापनाकडून तसेच विद्यापीठाकडून वेळोवेळी सोपविण्यात येणारी कर्तव्ये पार पाडणे, तसेच वेळोवेळी प्रदान करण्यात येणाऱ्या अधिकारांचा वापर करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०४१२०३०५५४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Urmila Vaibhav Joshi

Digitally signed by Urmila Vaibhav Joshi
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Urmila Vaibhav Joshi
Date: 2014.08.04 12:02:13 +05'30'

(उर्मिला जोशी

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सह संचालक, उच्च शिक्षण, अमरावती विभाग, अमरावती,
३. प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा,
७. समितीचे सदस्य यांना प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा यांचेमार्फत,
८. कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (मशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.